**१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या अतिरिक्त न्यायालयांतील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: विशेन्या १३२३/प्र.क्र.८५/का.९**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- २८ फेब्रुवारी, २०२४.

**संदर्भ:-**१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.विशेन्या-१३१६/प्र.क्र.२०५/का-९, दि.१८.०८.२०१७.
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. विशेन्या १३२३/प्र.क्र.८५/का.९, दि.२१.०९.२०२३
३) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. A (Spl.)/FTC/२०२४/२४/२०२४, दि.१२.०२.२०२४.
४) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.२१.०२.२०२४ .

**प्रस्तावना :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत ५ वर्षांच्या कालावधीकरीता एकूण १८ अतिरिक्त न्यायालये स्थापन करण्यात येऊन सदर जलदगती न्यायालयांसाठी संदर्भीय अ. क्र.१ येथील शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आली होती. तदनंतर मा. उच्च न्यायालयाकडून प्राप्त प्रस्तावानुसार अ. क्र. २ येथील शासन निर्णयान्वये अतिरिक्त न्यायालयांसाठीच्या अस्थायी पदांना दि.२९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. सदर अतिरिक्त न्यायालयांतील अस्थायी पदांना दि. २९.०२.२०२४ नंतर पुढील मुदतवाढ देण्याची विनंती संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये मा. उच्च न्यायालयाने शासनास केली आहे. संदर्भ क्र.४ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीकरीता अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१४ व्या वित्त आयोगांतर्गत स्थापन केलेल्या १८ अतिरिक्त न्यायालयांसाठीच्या पुढील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हा न्यायाधीश संवर्ग | | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) संवर्ग | |
|---|---|---|---|---|
| | पदनाम | पदसंख्या | पदनाम | पदसंख्या |
| १ | जिल्हा न्यायाधीश | १४ | दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) | ४ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १४ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ४ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | १४ | वरिष्ठ लिपिक | ४ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | १४ | कनिष्ठ लिपिक | ४ |
| ५ | शिपाई | १४ | शिपाई | ४ |
| | **एकूण** | ७० | **एकूण** | २० |
| **एकूण पदे : ९०** | | | | |
| ठोक वेतनावर बाह्ययंत्रणेद्वारे शिपाई - १८ | | | | |

२. याकरीता येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान-१०५-दिवाणी व सत्र न्यायालये (०७) अतिरिक्त न्यायालये (०७)(०१) अतिरिक्त न्यायालये (२०१४ ०५७५), या लेखाशिर्षाखाली" खर्ची टाकण्यात यावा व तो त्या लेखाशीर्षाखालील संबंधित वर्षासाठी मंजुर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क,दि.२१.०२.२०२४ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२४०३०५१८०३४१३३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढ़ण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2024.03.05 18:12:35 +05'30'

**( नंदकिशोर ल. मोरे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति :-**

१) मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ,
२) प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई
३) मुख्य महानगर न्यायदंडाधिकारी, मुंबई
४) जिल्हा व सत्र न्यायालय, संबंधित जिल्हे
५) महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
६) महालेखापाल-एक/दोन ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
९) जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हे
१०) वित्त विभाग व्यय-५,
११) विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५
१२) निवड नस्ती- का.९.